# गर्जा महाराष्ट्र माझा !!

सर्व महाराष्ट्रवासीयांना नेटाक्षरी च्या संपुर्ण टीम तर्फे
**महाराष्ट्र दिनाच्या** हार्दिक शुभेच्छा !


यजमान संपादक –
**आनंद माने (सोलापूर)**
**स्वप्ना कोल्हे ( नाशिक )**

सहसंपादक
**सोनाली घाटपांडे ( पुणे )**
**अहं ब्रह्मास्मि ( पुणे )**
**सारंग भणगे ( पुणे )**
**सुरुचि नाईक ( नागपूर )**
**सचिन काकडे (मुंबई )**
**रेणूका रेपाळ (अमेरिका)**
**नाम गुम जायेगा ( ठाणे )**



**ई-साहित्य प्रकाशन**
अंक क्र. २४ दि. २७ एप्रिल २००९

# नेटाक्षरी

भारतातील अर्थिक आणि सांस्कृतीक केंद्र स्थान असणारे आपले महाराष्ट्र राज्य १ मे १९६० रोजी अस्तित्वात आले. मराठी भाषिकांचे अस्तित्व असणा-या प्रदेशाला स्वतंत्र संयुक्त राज्याचा दर्जा मिळावा यात संयुक्त महाराष्ट्र चळवळीचे फ़ार मोठे योगदान आहे. १०५ हुतात्म्यांच्या बलीदानानंतर मिळालेला महाराष्ट्र ही स्वस्तात मिळालेली देण नाही याची प्रत्येक महाराष्ट्रीय नागरिकाला जाणीव करून देणारे हुतात्मा स्मारक आजही मुंबईच्या फ़्लोरा-फ़ाउंटन उर्फ़ हुतात्मा चौकात अभिमानाने उभे आहे, संयुक्त महाराष्ट्रासाठी लढलेल्या आचार्य अत्रे, प्रबोधनकार ठाकरे, सेनापती बापट तसेच त्या १०५ हुतात्म्यांना 'नेटाक्षरी' चा मानाचा मुजरा.



याच दिवशी असणा-या कामगार दिना निमीत्त या जगाच्या औद्योगिक प्रगतीचा आधार असणा-या 'मुळ' व्यक्तीला म्हणजेच राबत्या हाताला सलाम, या अंकातल्या कविता ही आम्ही या विषयांशी निगडीतच निवडलेल्या आहेत, आम्ही आशा करतो नेहमीप्रमाणे हा अंक सुद्धा आपल्या पसंतीस उतरेल.

**-संपादकीय मंडळ**

# ते गिरणी कामगार

कालच एक बातमी ऐकली
गिरणी कामगारांच्या मुलांना मिळणार
७५ टक्के आरक्षण
गिरणीच्या जागी उभ्या रहाणा-या प्रत्येक व्यवसायात
अन सारं गिरणगांवच सुखावलं

थोडंसं मन गेलं भूतकाळात
आठवू लागलं सारं काही....
१९८२ चा संप आणि त्यात
नोकरी गेलेल्या कित्येक जणांचे
उघड्यावर पडलेले संसार ....
पण हे पहायला तेव्हा हे डोळे आले नव्हते ह्या जगात ....

ह्या डोळ्यांनी पाहिलं ते
गिरणीच्या जमिनी विकता याव्यात म्हणून
गिरण्यांना आग लावणा या
त्या गिरणी मालकांचे निष्ठूर चेहरे ....

अन ह्या डोळ्यांनी अजून एक गोष्ट पाहिलीय
त्या जळालेल्या गिरणीची राख
स्वतःचं नशीब मानून डोक्याला
लावणारे
ते गिरणी कामगार ....

**- चैताली म्हापसेकर**

## कंडोम

भांडवलशाही ख-या अर्थाने रुजवलीत तुम्ही मालक
आता या देशावर तुमचेच राज्य चालू झाले मालक

भाकरीसाठी लढायचा अधिकार काढून घेतलात मालक
नोटा चारून संप फ़ोडण्यात तरबेज झालात तुम्ही मालक

मजुराचे रक्त खुप स्वस्त दरात मिळते या देशात मालक
५-५० रुपये थोबाडावर फ़ेकून ८ तास शोषायला  चटावलात तुम्ही मालक

देशातल्या राज्यकर्त्यांचे खरे रंग उमगलेत आम्हां मालक
निळे, तिरंगी, भगवे सा-यांचा एकच रंग - उमगले आम्हां मालक

भांडवलशाहीत जातीव्यवस्था चांगलीच राबवलीत मालक
कंत्राटी कामगार नांवाची नवीन जात निर्माण केलीत मालक

कंत्राटी कामगार , पण कच्ची बच्ची आहेत आम्हाला मालक
वापरा, काम झाले की फ़ेकून द्या - असं करायला कंडोम नाही
कामगार आहोत आम्ही मालक

**---अविनाश कुलकर्णी**

**मी मराठी - - - - - मी मराठी**

नाव मराठी गाव मराठी
अंतरीचा भाव मराठी

काळजाचा ठोका मराठी
लक्ष गाठणारा झोका मराठी

साद मराठी प्रतिसाद मराठी
श्वास मराठी विश्वास मराठी

नाद मराठी नाळ मराठी
सप्तसुरांचा ताल मराठी

सत्व मराठी व्यक्तीमत्व मराठी
रोमरोम अस्तित्व मराठी

गर्व मराठी पर्व मराठी
तू मी चोहीकडे सर्व मराठी

साज मराठी आवाज मराठी
माझा हरेक अंदाज मराठी

वर्तमान मराठी भविष्य मराठी
हरेक क्षण अन आयुष्य मराठी

विनय मराठी विजय मराठी
हरेक रक्त अजय मराठी

मी मराठी - - - - - मी मराठी

- **कुणाल रुद्रके**

## महाराष्ट्र माझा

आशेचा हा देश रांगडा
घामाने भिजली माती
अंतरात या फुले उमलती
जरी आहे तगडी छाती

विस्तृत आहे विशाल आहे
पोसल्यात कित्येक जाती
धुमसणारी मशाल आहे
पाहिल्यात कातर राती

ज्ञानाचे भांडार यारहो
प्राचीन कलेशी नाती
सह्याद्रीचा उंच कडा अन
फेसाळणा-या समुद्रलाटा
गीत तयाचे गाती

राष्ट्र नव्हे या 'महा'राष्ट्र म्हणावे
ही ऐसी बुलंद ख्याती

**- आनंद माने**

## सुर्य तापवतोय

सध्या रस्त्याच्या डांबरीकरणाचं काम चाललंय। रोज या कामाकडे पाहताना मन अस्वस्थ होतं आणि ....

सुर्य तापतोय
सुर्य तापवतोय
त्यांच्यासाठी
हे दिवस
"समरकॅंप" चे
कुणाला ओढ
खिमींग़ची

हेच उन्ह
घेत असतं
कठोर परीक्षा
आमच्या
जगण्याची
पत्रे तापतात
धारा अखंड...

उन्हात राबण्याचं
प्राक्तन कोरलेलं
आमच्या पुढ्यात
कधीच नसतं
"एसी"त वावरण्याचं
थंडगार स्वप्न,
का, कुणास ठाऊक ?

रस्त्याच्या कामावर
खडी फ़ोडताना
फ़ुटत असतात
हाताची फ़ोडं
घामात न्हाताना
त्यांच्या वेदना
विसरून गेलेल्या

सूर्य कलतो
वेध परतण्याचे
घराच्या भिंती
भाजलेल्या
अन भाजणाया
घागरीतलं
पाणी तापलेलं...

उन्हाळयाच्या नावानं
सुटी नसते
एखादा उन्हाळा
बघा की असा अनुभवून
सुटी न घेता
खिमींगला न जाता
"एसी"त न बसता
आणि
घागरीतलं पाणी पिऊन ...

**श्रीपाद कुलकर्णी**
**औरंगाबाद**

# माणसाची आरती

तू कर्ता तू धर्ता कर्मा धर्माचा
तू रक्षक तू भक्षक जन्मा मरणाचा
प्राणी प्रयत्नवादी दृढनिश्चयाचा
तू स्वामी तू सेवक तव इंद्रीयांचा

जय दे बा जय दे बा जय दे माणसा
तुझिया कर्मावरती ठेवी भरवंसा जय दे जय दे ।।ध।।

अनंत कोटी जीव तू एक त्यात
कोटी कोटी वर्षे वर्शत उत्क्रांत
द्रष्टा श्रोता वक्ता स्मरणीय स्मरणांत
अखंड अगणित अविरत रतउद्योगांत
जय दे जय दे ।।१।।

सप्त समुद्रे खंडे पर्वत हिमशिखरे
दुर्घट दुस्तर दुर्गम क्षेत्रे गिरिकुहरे
कोटी प्रकाशवर्षे अंतर विस्तारे
साधी प्रवास यत्ने प्रतिभे आधारे
जय दे जय दे ।।२।।

योजक आयोजक जीवन संयोगाचा
प्राणी प्रधान प्रेरक तू अस्तित्त्वाचा
साधक संशोधक जीवन व्यापाराचा
कारक मारक तारक तू संस्कृतीच
जय दे जय दे ।।३।।

**- गणेश अनंत अडकर**

## "माझी म-हाठमोळी भाषा"

माझ्या मराठी मातीला
गंध भक्तीच्या फुलांचा ।
ज्ञाना-तुकाने लावला
वेलू ओव्या-अभंगाचा ।।

माझ्या म-हाठी झेंड्याची
ढाल जिजाई खंबीर ।
शिवबाच्या बाण्याम्होर
तुके वै-याचा खंजीर ।।

माझ्या म-हाठीची गोडी
नसानसात भिनते ।
साता समुद्रा पल्याड
वारू म-हाठी दौडते ।।

मानी म-हाठी ज्योतीला
छेडू नका कंदी मंदी ।
शे-शे मशालीची आग़
एका एका वातीमंदी ।।

म-हाठमोळी माझी भाषा
सा-या विश्वात नांदते ।
तरी लहू म-हाठीचे
तीन रंग़ात रंग़ते ।।

**- रेणूका खटावकर**

## महाराष्ट्र हा कोणाचा ??

महाराष्ट्र हा कोणाचा, नाम्याचा आणि जनीचा
दाम्याच्या भरल्या गोणीचा, चोखोबांच्या वाणीचा

महाराष्ट्र हा कोणाचा, भागवताच्या अधिष्ठाणाचा
मुक्ता अन सोपानाचाा, निवृत्ती अन ज्ञानाचा

महाराष्ट्र हा कोणाचा, पैठणच्या नाथांचा
जय जय रघुवीर समर्थांचा, तुकोबाच्या गाथांचा

महाराष्ट्र हा कोणाचा, प्रतिपालक शिवाजीचा
देशपाड्यांच्या बाजीचा, धर्मवीर संभाजीचा

महाराष्ट्र हा कोणाचा, नरवीर तानाजीचा
शुरवीर मुरारबाजीचा, धनाजी आणि संताजीचा

महाराष्ट्र हा कोणाचा, दगडांचा अन धोंड्यांचा
कोंडांचा अन ओंडाचा, खिल्लारी खो ंडांचा

महाराष्ट्र हा कोणाचा, पिकलेल्या आमराईचा
हिरव्या वनराईचा, आणि दुभत्यागाईंचा

- **हरिष दांगट**

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास ‘नेटाक्षरी’ जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ३५००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्याव्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करून वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फ़ॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतू असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू . मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहोचवण्याचा आमचा संकल्प सिद्धीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

netaksharee@gmail.com